**सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत प्राधान्य कुटुंबातील तसेच १४ जिल्ह्यांतील एपीएल (केशरी) शेतकरी लाभार्थ्यांना माहे नोव्हेंबर, २०२० साठी साखर वितरित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांक -साखर-११२०/प्र.क्र.१६४/नापु-१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - २४ नोव्हेंबर, २०२०

**प्रस्तावना :**

कोरोना विषाणूच्या पार्श्वभूमीवर दिवाळी सणाच्या निमित्ताने राज्यातील प्राधान्य कुटुंबातील लाभार्थी तसेच १४ जिल्ह्यांतील एपीएल (केशरी) शेतकरी लाभार्थ्यांना माहे नोव्हेंबर, २०२० साठी प्रति कुटुंब १ किलो याप्रमाणे साखर वाटप करण्याच्या प्रस्तावास व त्यासाठी येणाऱ्या खर्चास दि.०५.११.२०२० च्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णयः-**

राज्यातील प्राधान्य कुटुंबातील लाभार्थी तसेच १४ जिल्ह्यांतील एपीएल (केशरी) शेतकरी लाभार्थ्यांना माहे नोव्हेंबर, २०२० साठी प्रति कुटुंब १ किलो याप्रमाणे साखर वाटप करण्यास या निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

१) उक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्यातील प्राधान्य कुटुंबातील लाभार्थी तसेच १४ जिल्ह्यांतील एपीएल (केशरी) शेतकरी लाभार्थी कुटुंबांना माहे नोव्हेंबर, २०२० साठी प्रति कुटुंब १ किलो याप्रमाणे १३९६५९ क्विंटल साखर वाटप करण्यास व त्यासाठी येणाऱ्या रु. ५२.७२ कोटी एवढ्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२) उपरोक्त प्रमाणे माहे नोव्हेंबर, २०२० करिता खरेदी करण्यात आलेल्या साखरेसाठीचा निधी मुंबई विभागासाठी मुख्य लेखाशिर्ष ४०८००७७ व मुफसल विभागासाठी ४४०८००९५ या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. त्याबाबतचे तपशीलवार लेखाशिर्ष अनुक्रमे एम-०४,०१,अन्न १०१, प्रापण व पुरवठा, (०२)प्रापण व वितरण आणि किंमत नियंत्रण, (०२) (०१), मुंबई शहर -खरेदीची किंमत (अनिवार्य) (४४०८००७७) २१, पुरवठा व सामग्री व (०२) (०२) मुफसल (दत्तमत) (अनिवार्य) ४४०८००९५, २१, पुरवठा व सामग्री या लेखाशिर्षाखाली खर्च करावयाचा आहे.

३) वरील प्रमाणे खरेदी करण्यात आलेल्या माहे नोव्हेंबर, २०२० साठीच्या साखरेचा अनुषंगिक खर्च मुंबई विभागासाठी मागणी क्रमांक एम-४ (०२) (०५) मुंबई अन्नधान्य

खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य) (४४०८०२६४) (५०), इतर खर्च व मुफसल विभागासाठी मागणी क्रमांक एम-४ (०२) (०६) मुफसल अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य) (४४०८०२७३) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४) लाभार्थी कुटुंबाना साखर वितरत केल्यानंतर (प्रति किलो रु. २० /- याप्रमाणे साखर विक्री केल्यानंतर ) मुंबई विभागातून उपलब्ध होणारा निधी ४४०८०१६६ व मुफसल विभागातून विक्रीतून उपलब्ध होणारा निधी ४४०८०१७५ या लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २९०अ/व्यय-१०, दि.०९.११.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२०११२४१२१०२३३२०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Charushila
Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies and Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, serialNumber=2b0496c0c213a3f50c6522cc39ae5de95e1150ac3287e89c21b1422e313820a2, cn=Charushila Chandrakant Tambekar
Date: 2020.11.24 12:14:37 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**
सह सचिव
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
२. मा.मंत्री, (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री, (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
४. मुख्य सचिव यांचे उपसचिव.
५. महासंचालक, माहिती जनसंपर्क मंत्रालय,मुंबई
६. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
७. वित्तिय सल्लागार व उपसचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं) पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
८. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
९. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३.संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१४.निवड नस्ती, नापु-१७